मिशन महासंचालक, मनरेगा या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील सेवानिवृत्त अधिका-याची सेवा उपलब्ध करुन घेणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मग्रारो-२०२३/प्र.क्र.१९/रोहयो-७**
१६ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- १८ एप्रिल, २०२३.

वाचा :

१) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी कायदा - २००५,
२) महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम (सुधारित) कायदा - २०१४,
३) नियोजन (रोहयो) विभागाचा शासन निर्णय क्र. मग्रारोहयो -२०२२/प्र.क्र.१७४/रोहयो-६अ , दिनांक १४ डिसेंबर, २०२२
४) नियोजन (रोहयो) विभागाचा शासन निर्णय क्र.मग्रारो-२०२२/प्र.क्र.१७४/रोहयो-६अ, दिनांक ३ जानेवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

२. मा. मंत्रीमंडळ बैठक क्र. १९ दिनांक १३ डिसेंबर, २०२२ रोजीच्या बैठकीत मनरेगा व विविध विभागांच्या योजनांच्या अभिसरणातून सुविधा संपन्न कुटुंब मिशन व सर्वांगीण ग्राम समृद्धी योजनेस राज्य योजना म्हणून राबविण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच राज्याचा रोहयो कायदा २०१४ च्या तरतुदीनुसार मनरेगा योजनेची मिशन मोडवर प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी मिशन कार्यालय स्थापन करण्यासही मा. मंत्रीमंडळाच्या सदर बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. प्रस्तावित मिशनच्या प्रमुख पदी मिशन महासंचालक, मनरेगा हे कार्य करतील.

**शासन निर्णय :-**

३. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना कायदा २००५ चे प्रकरण ५ मधील कलम २१ (१) नुसार तसेच नियोजन (रोहयो) विभागाच्या दिनांक १९ नोव्हेंबर, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्मित राज्य निधी असोसिएशनच्या कार्यकारी समितीची दिनांक ११ एप्रिल, २०२३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये उल्लेखीत शासन निर्णयातील परिच्छेद १५ (२) अन्वये कार्यकारी समितीस प्रदत्त अधिकारानुसार मिशन महासंचालक, मनरेगा या पदाची कार्यकक्षा, अर्हता, निवड प्रक्रिया, मानधन इत्यादीस शासन मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रस्तावास याद्वारे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. **पदाचे नाव-** मिशन महासंचालक, मनरेगा.

५. **अर्हता -** मिशन महासंचालक हे शासनाने नियुक्त केलेले, शासन किंवा शासन सेवेतून निवृत्त झालेले सचिव श्रेणीतील किंवा तत्सम अधिकारी असतील. मनरेगा योजना राबविण्याचा अनुभव असणाऱ्या सेवानिवृत्त अधिकाऱ्यास प्राधान्य देण्यात येईल.

६. **अर्जाच्या वेळी वयोमर्यादा :** कमाल ६२ वर्ष

७. शासन सेवेतून निवृत्त झालेल्या अधिका-यांची मिशन महासंचालक, मनरेगा पदी नियुक्ती केल्यास त्यांना सेवानिवृत्त अधिकाऱ्यांना नियुक्ती देण्यात येणारे नियामक मंडळाचे/प्राधिकरणांचे अध्यक्ष/मुख्य आयुक्तांना शासनाच्या विहित नियमानुसार अनुज्ञेय मानधन व निवास्थान अनुज्ञेय असेल.

८. **कार्यकक्ष -** मिशन महासंचालक यांची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहतील

(i) महासंचालकांनी राज्यातील MGNREGA च्या अंमलबजावणीचे निरीक्षण आणि मूल्यमापन करणे आवश्यक आहे, हे सुनिश्चित करून की ही योजना त्याच्या उद्दिष्टांची पूर्तता करत आहे आणि त्याची उद्दिष्टे साध्य करण्याच्या दिशेने प्रगती करत आहे.

(ii) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी करिता सर्व पातळीवरील कार्यक्रम अधिकारी यांच्यात समन्वय निर्माण करणे.

(iii) मिशन महासंचालक, मनरेगा यांचे कर्तव्ये आणि कार्ये यामध्ये खालील बाबींचा समावेश असेल-

(a) राज्य सरकारला योजना आणि त्याची राज्यात अंमलबजावणी यासंबंधीच्या सर्व बाबींवर सल्ला देणे;

(b) केंद्र शासनाकडून मान्य असलेल्या कामातून राज्यासाठी आवश्यक कामे निश्चित करणे;

(c) वेळोवेळी निरीक्षण आणि निवारण यंत्रणेचे पुनरावलोकन करणे आणि सुधारणांची शिफारस करणे;

(d) मनरेगा कायदा आणि त्याअंतर्गत असलेल्या योजनांबद्दल माहितीचा जास्तीत जास्त प्रसार करणे;

(e) राज्यात या कायद्याच्या आणि योजनांच्या अंमलबजावणीवर लक्ष ठेवणे आणि केंद्र शासनाकडून अधिकाधिक निधी उपलब्ध करून घेणेकरिता उपाय योजना सुचविणे;

(f) योजनेची प्रभावी अंमलबजावणीसाठी क्षमता बांधणी निर्माण करणे;

(g) राज्य सरकारद्वारे सोपविण्यात आलेले अन्य कोणतेही कर्तव्य किंवा कार्य.

९. या अनुषंगाने वाचा क्र ४ च्या शासन निर्णयास मान्यता देण्यात येत आहे. तसेच वाचा ३ मधील विचारांची सातत्य ठेवण्याच्या बेताने या शासन निर्णयानुसार मिशन महासंचालक, मनरेगाचे पद दिनांक १ जून, २०२३ किंवा त्यापूर्वी भरण्यात यावे.

१०. मिशन महासंचालक, मनरेगा यांचे निवड प्रक्रिये संदर्भातील कार्यपध्दती खालीलप्रमाणे विहीत करण्यात येत आहे.

**अ) निवडीसाठी जाहिरात व अर्जाचा तपशील :-**

मिशन महासंचालक, मनरेगा या रिक्त पदासाठी राज्यातील प्रमुख वर्तमानपत्रात तसेच शासनाच्या संकेतस्थळावर माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत जाहिरात देण्यात यावी. या जाहिराती अनुसार उमेदवाराची वैयक्तीक माहिती, कामगिरी/ कार्यानुभवाचा कालावधी बाबतीत तपशील संबंधित उमेदवार अनुक्रमे प्रपत्र-अ, ब तसेच प्रपत्र-क नुसार सादर करतील.

**ब) छाननी समितीची स्थापना :-**

मिशन महासंचालक, मनरेगा या रिक्त पदावरील नियुक्तीसाठी छाननी समिती गठीत करण्यात येत आहे. या समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग | सदस्य |

**समितीची कार्यकक्षा :-**

सदर समिती, बैठक आयोजित करुन प्राप्त अर्जाची, प्राथमिक छाननी करील. तसेच अधिक संख्येने अर्ज आल्यास उमेदवारांच्या अर्जाची १ : ३ या गुणात्तरात संक्षिप्त यादी तयार करील. सदर संक्षिप्त यादी मधून मा. मुख्यमंत्री व मा. मंत्री (रोहयो) मिशन महासंचालक, मनरेगा यांची अंतिम निवड करतील.

११. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १९६/ आपुक दिनांक १३ एप्रिल, २०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१८१७५९०३६४१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

SANJANA PRADEEP KHOPDE

Digitally signed by SANJANA PRADEEP KHOPDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=162267a166279e51cd3f1cc6e10b61ce9868a859260375a1bba3e5f88931d998, pseudonym=2911D7031787EE13B33E937FE23AAB741D4241E4, serialNumber=5835A30DD240A2D86C82FB33FB5D7BCBF513D6EBBB4EFF8873D4E0AECC934DB5, cn=SANJANA PRADEEP KHOPDE
Date: 2023.04.19 13:32:30 +05'30'

**( संजना खोपडे )**

**उप सचिव (रोहयो), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव,
३. मा. अपर मुख्य सचिव (रोहयो), यांचे स्वीय सहायक,
४. मा. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,
५. मा. अपर मुख्य सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग,
६. सर्व विभागीय आयुक्त,
७. आयुक्त, कृषी आयुक्तालय, पुणे,
८. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर,
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
११. सर्व उपायुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालये,
१२. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, पुणे,
१३. संचालक (मृद संधारण), कृषी आयुक्तालय, पुणे,
१४. मुख्य अभियंता (मृद व जलसंधारण) सर्व,
१५. सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी,
१६. सर्व जिल्हा रेशीम अधिकारी,
१७. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो),
१८. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (नरेगा, ग्रामपंचायत),
१९. सर्व गटविकास अधिकारी, नरेगा,
२०. उपवनसंरक्षक (सर्व),
२१. उपसंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व),
२२. वित्त विभाग (अर्थ-१६ , व्यय-८),
२३. नियोजन विभाग (का.१४३४ व का.१४२४),
२४. निवड नस्ती, रोहयो - ७.

**प्रपत्र "अ"**

**मनरेगा योजनेची प्रभावी अंमलबजावणी करिता स्थापन करण्यात आलेल्या मिशन कार्यालयाच्या प्रमुखपदी मिशन महासंचालक, मनरेगा या पदाच्या विचारार्थ पाठवावयाच्या तपशीलाचे प्रपत्र**

**उमेदवाराचे छायाचित्र**

| | | |
|---|---|---|
| **१.** | **संपूर्ण नांव** | : |
| **२.** | **जन्म दिनांक** | : |
| **३.** | **सध्याचा पत्ता** | : |
| **४.** | **संपर्क क्रमांक** | : |
| **५.** | **ई-मेल** | : |
| **६.** | **शैक्षणिक अर्हता** | : |
| **७.** | **प्रख्यात असलेले क्षेत्र** | : |
| **८.** | **सध्याचा व्यवसाय** | : |
| **९.** | **कामगिरी/कार्यानुभव (जोडपत्र प्रमाणे)** | : |

**दिनांक :**

**ठिकाण :** **सही :**

**(उमेदवाराचे संपूर्ण नांव)**

## जोडपत्र “ब”

**(शासन सेवेतील मागील 5 वर्षे)**

| अ.क्र. | पद | विभाग | कालावधी | | कामगिरी/कार्यानुभव यांचा तपशिल (थोडक्यात) |
|---|---|---|---|---|---|
| | | | पासून | पर्यंत | |
| | | | | | |
| | | | | | |

## जोडपत्र “क”

**मिशन महासंचालक, मनरेगा या पदासाठी अर्ज करणा-या उमेदवारांच्या कामगिरीचा तपशील (थोडक्यात)**